भाषा संचालनालयाच्या आस्थापनेवरील सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली), गट-ब (राजपत्रित) पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
शासन निर्णय क्रमांक:- मलोआ-२०२२/प्र.क्र.९४/आस्था-२
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ फेब्रुवारी, २०२३

**वाचा :-** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/कार्या.८,दिनांक २२ जून, २०२१

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.एलएमआर २५२२/प्र.क्र.३५/२०२२/अठ्ठावीस, दि. २६ डिसेंबर, २०२२ अन्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केल्यानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून पुढील उमेदवाराची भाषा संचालनालयाच्या आस्थापनेवरील सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली), गट-ब (राजपत्रित) या पदावर सातव्या वेतन आयोगानुसार एस-१५: ४१८००-१३२३०० + इतर भत्ते या वेतनश्रेणीत खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

| गुणवत्ता क्र. | उमेदवाराचे नाव | वर्गवारी | शेरा |
|---|---|---|---|
| १. | श्री. संतोष दुर्गादास गोसावी | अमागास | अराखीव असलेल्या पदावर |

२. **अटी व शर्ती :-**

१) वरील उमेदवाराची नियुक्ती वैद्यकीय तपासणी व पुर्वचारित्र्य पडताळणीच्या अधीन (सहा महिन्यांच्या आत) तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे.

२) आवश्यकतेनुसार जात वैधता प्रमाणपत्र तसेच, अप्रगत गटात मोडत असल्यास (नॉन क्रिमिलेयर) प्रमाणपत्र या आदेशाच्या दिनांकापासून सहा महिन्यांच्या कालावधीत सादर करावेत. या प्रमाणपत्रांची पूर्तता सहा महिन्यांच्या कालावधीत न झाल्यास त्यांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल. सदरील प्रमाणपत्रांची विहित मुदतीत पूर्तता करण्याच्या अधीन सदर नियुक्ती देण्यात येत आहे.

३) वरील उमेदवाराने त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षांचा परिवीक्षा कालावधी पूर्ण करणे आवश्यक आहे. या परिवीक्षा कालावधीत कामाचा अपेक्षित दर्जा त्यांनी प्राप्त न केल्यास अथवा त्यांची वर्तणूक असमाधानकारक आढळून आल्यास, त्यांची सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली) या पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यास ते पात्र असतील.

४) सदर पदावर नियुक्त होणाऱ्या उमेदवारास परिवीक्षा कालावधीत वाचा येथे नमूद शासन निर्णयातील सर्व अटी व शर्ती लागू राहतील.

५) वरील उमेदवाराची सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली) या पदावरील ज्येष्ठता विहित नियमातील तरतुदींनुसार व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या गुणवत्ता क्रमांकानुसार राहील.

६) वरील उमेदवाराने भाषा संचालनालयातील त्यांच्या नियुक्तीच्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत रूजू व्हावे. या मुदतीत ते नियुक्तीच्या पदावर रुजू झाले नाहीत तर त्यांच्या नियुक्तीचे आदेश कोणतीही पूर्वसूचना न देता रद्द करण्यात येतील याची उमेदवारांनी नोंद घ्यावी.

विहित कालावधीत काही अपरिहार्य, उचित कारणास्तव त्यांना रुजू होण्यासाठी मुदतवाढ हवी असल्यास त्यांनी शासनाकडून मुदतवाढ घेणे आवश्यक असून, तशी मुदतवाढ न घेतल्यास किंवा शासनाकडून तशी मुदतवाढ न मिळाल्यास महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या गुणानुक्रमानुसार त्यांना ज्येष्ठता मिळणार नाही व ते हजर होतील त्या दिनांकापासून त्यांची ज्येष्ठता गृहीत धरण्यात येईल. विहित कालावधीत सेवेत हजर न होणारे तसेच, हजर होण्यासाठी मुदतवाढ न घेणारे उमेदवार नियुक्तीसाठी इच्छुक नाहीत, असे गृहीत धरुन त्यांचे नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द झाल्याचे समजण्यात यावे.

७) वरील उमेदवारास नियुक्तीनंतर कोणत्याही कारणास्तव शासकीय सेवेचा राजीनामा द्यावयाचा असेल तर त्यांनी नियमानुसार शासनास त्यासंबंधीची लेखी सूचना एक महिना आगाऊ देणे आवश्यक आहे. अन्यथा त्यांना एक महिन्याचे मूळ वेतन शासनाकडे जमा करावे लागेल.

८) वरील उमेदवाराने महाराष्ट्र नागरी सेवा (लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापत्र) नियम, २००५ च्या नियम ४ नुसार विहित नमुना “अ” मधील प्रतिज्ञापत्र सादर केले आहे.

९) सदर उमेदवारास वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दि. ३१ ऑक्टोबर, २००५ च्या तरतूदींनुसार “परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन” योजना लागू राहील.

१०) भाषा संचालनालय (मुख्यालय, मुंबई) ते विभागीय कार्यालयांमध्ये वरील उमेदवार बदलीस पात्र आहेत.

११) वरील उमेदवारांनी शालान्त प्रमाणपत्र परीक्षा, मराठी (उच्चस्तर) व हिंदी या विषयांसह उत्तीर्ण केली असल्यामुळे त्यांना एतदर्थ मंडळाची मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येत आहे.

१२) वरील उमेदवाराने शासनाने विहित केलेली संगणक अर्हता धारण केलेली आहे.

१३) वरील उमेदवाराने शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांकरिता विहित केलेल्या वर्तणूक नियमांचे काटेकोर पालन करणे बंधनकारक आहे.

१४) वरील उमेदवारास शासनाने वेळोवेळी विहित केलेले प्रशिक्षण पूर्ण करणे बंधनकारक आहे.

१५) वरील उमेदवाराने त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून सहा महिन्यांच्या आत स्वग्राम घोषित करणे आवश्यक आहे. तद्नंतर त्यांनी स्वग्राम घोषित केल्यास संपूर्ण सेवेच्या कालावधीमध्ये स्वग्रामामध्ये बदल करता येणार नाही.

१६) वरील उमेदवार सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली) या पदावर रूजू झाल्यानंतर त्यांची पदस्थापना खाली दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव | पदस्थापना/नियुक्तीचे पद |
|---|---|---|
| १. | श्री. संतोष दुर्गादास गोसावी | भाषा संचालनालय, मुंबई मुख्यालय येथे सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली) या संवर्गातील उपलब्ध रिक्त पदावर. |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२१७११३७३२४३३३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJAY DHONDBARAO BHOSALE

Digitally signed by AJAY DHONDBARAO BHOSALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1da605d815512e5b0901a07f495f12959146d0936ce1aa35f9fa378e1a4d6a87, pseudonym=2C09EE78E36A33F8C497462301F1790AE4E0746A, serialNumber=BE88F3DC57FA6737970A6A01AEDFBFE6642BB00FC7B162A3142176A6FCCB21CD, cn=AJAY DHONDBARAO BHOSALE
Date: 2023.02.17 13:49:55 +05'30'

(अ. धों. भोसले)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रती,

श्री. संतोष दुर्गादास गोसावी, २१/५३, कुशावार्ता, लेन नं. ५, लवाटे नगर १, जय भवानी पथ, तुलसी पार्क, ऑपोझिट पार्थ स्नेह बिल्डींग, नाशिक रोड, नाशिक - ४२२१०१

प्रत,

१. भाषा संचालक, भाषा संचालनालय, मुंबई
त्यांना विनंती करण्यात येते की, श्री. गोसावी यांना सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली) या पदावर रूजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच, वरीलप्रमाणे दर्शविलेल्या पदस्थापनेच्या पदावर त्यांना रुजू करुन घेण्यात यावे व रुजू अहवाल तात्काळ शासनास सादर करावा.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने)
५. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. भाषा संचालनालय, विभागीय कार्यालय, नवी मुंबई, पूणे, नागपूर, औरंगाबाद (भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे द्वारा)
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. मराठी भाषा विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती.